**अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र पुरस्कृत कृषी उन्नत्ती योजना-राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य-कॅफेटेरीया- या योजनेसाठी सन २०२३-२४ करीता निधी वितरण.**
**(केंद्र हिस्सा - २४०१ A (७४४)**
**(राज्य हिस्सा - २४०१ A (७५३)**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-**२०२३**/प्र.क्र.०७/कार्यासन ६
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १८ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) वि. वि., शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२) केंद्र शासन, कृषी मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.1-15/2023-RKVY, दि.०२.०८.२०२३.
३) कृषी व पदुम विभागाची नस्ती क्र.राकृवि-०८२३/प्र.क्र.१४०/१४-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत कृषी उन्नत्ती योजना-राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य-कॅफेटेरीया या योजनेचा सन २०२३-२४ करीता केंद्र शासनाकडून पहिल्या हप्त्यासाठी रु.३०३.०० लाख इतका निधी प्राप्त झाला आहे. त्यास अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.३०३.०० लाख व समरुप राज्य हिश्श्याकरीता रु.२०२.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत कृषी विभागाने संदर्भाधीन क्र.३ अन्वये प्रस्ताव सादर केला होता. सदर प्रस्तावावर वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन, अंतर्गत केंद्र पुरस्कृत कृषी उन्नत्ती योजना-राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य-कॅफेटेरीया या योजनेकरीता केंद्र शासनाकडून सन २०२३-२४ करीता पहिल्या हप्त्यासाठी रु.३०३.०० लाख इतका निधी प्राप्त झालेला आहे. त्यास अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.३०३.०० लाख व व समरुप राज्य हिश्श्याकरीता रु.२०२.०० लाख असा एकूण रु.५०५.०० लाख इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पित तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| केंद्र पुरस्कृत कृषी उन्नत्ती योजना-राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य-कॅफेटेरीया | २४०१ ए ७४४ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | १९९९.९९ | ३०३.०० |
| | २४०१ ए ७५३ राज्य हिस्सा (४० टक्के) | | १३३२.९९ | २०२.०० |
| **एकूण** | | | **३३३२.९८** | **५०५.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.५०५.०० लाख (अक्षरी रुपये पाच कोटी पाच लाख फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील. यामध्ये प्रामुख्याने आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याच्या योजनेसह वैयक्तिक लाभाच्या योजना राबविता येतील. मात्र आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत व वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१७१७०७४६४७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2023.08.21 13:05:38 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.